**पाटबंधारे उपविभाग, रावेर या उपविभागाचे मुख्यालय हिंगोणा येथे करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आढावा-२०१७/प्र.क्र.७७/२०१७/आ(प्रशि),**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ जुलै, २०१७.

वाचा: १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : ईआरडब्ल्यू १०८३/सीआर ६११/८३/ एडीएम-९, दि.८/३/१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५/१०/१९९२.
३) शासन निर्णय जलसंपदा विभाग, क्रमांक: आढावा-१००२/३३५/२००२/आ(प्रशि), दि.०६/०२/२००३.

**प्रस्तावना :**

लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव अंतर्गतचा पाटबंधारे उपविभाग, रावेर हा उपविभाग जळगांव पाटबंधारे विभाग, जळगांव या कार्यालयापासून सर्वसाधारण ८५ कि.मी. असून हिंगोणा हे साधारण ६० कि.मी. अंतरावर आहे. तसेच, मोर मध्यम प्रकल्पाचा सांडवा द्वारयुक्त असुन सदर प्रकल्प हा सातपुडा पर्वत रांगेत आहे व सदर प्रकल्पासाठी येणारा पुराचा अंदाज आणि त्याचे नियमन करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही उपविभागा मार्फत होऊ शकते. त्यामुळे उपविभागाचा विभागाशी लवकर संपर्क शक्य होईल. सदर उपविभागाच्या कार्यक्षेत्राचा विचार करता, हिंगोणा हे मुख्यालय सर्वसाधारणपणे मध्यभागी असल्याने, उप अभियंता यांना कार्यक्षेत्राची पाहणी करण्यास सुलभता येऊ शकेल. या सर्व बाबी विचारात घेता प्रकल्पाची कामे अधिक कार्यक्षमतेने करण्यासाठी पाटबंधारे उपविभाग, रावेर या उपविभागीय कार्यालयाचे मुख्यालय हिंगोणा येथे स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव यांचे नियंत्रणाखालील कार्यकारी अभियंता, जळगांव पाटबंधारे विभाग, जळगांव अंतर्गतचा पाटबंधारे उपविभाग, रावेर या उपविभागीय कार्यालयाचे मुख्यालय हिंगोणा येथे स्थलांतरीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) स्थलांतरीत उपविभागीय कार्यालय मूळ कार्यभारासह व मंजूर पदांसह स्थलांतरीत मुख्यालयाच्या ठिकाणी कार्यरत राहील.
२) स्थलांतरीत उपविभागीय कार्यालय शासकीय जागेतच कार्यान्वित करण्यात यावे, त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये. तसेच सध्याच्या कार्यरत उपविभागातील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा.
३) प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

२. उपविभागीय कार्यालयाच्या मुख्यालय बदलानुसार सदर कार्यालय दिनांक १ ऑगस्ट, २०१७ पासून कार्यान्वित होईल याद्दष्टीने कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही तात्काळ करावी.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. १०९२/सीआर-८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा २०१७०७१९१६०६५१२८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce263 68b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.07.19 16:03:11 +05'30'

**( वि. का. चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा.
७. मा.विधानसभा/ विधान परिषद सदस्य (सर्व).
८. प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१२. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१३. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक.
१५. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१६. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
१८. सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१९. आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव.
२१. कार्यकारी अभियंता, जळगांव पाटबंधारे विभाग, जळगांव.
२२. अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयांच्या बदलाची आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२३. सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.